**स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीस दि. १ एप्रिल २०२५ ते ३१ मार्च २०२६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** स्वभामि-२०२०/प्र.क्र.१७७/पापु-१६

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: १५ एप्रिल, २०२५

वाचा :-१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. स्वभामि-२०२०/प्र.क्र.१७७/पापु-१६, दिनांक ११.१०.२०२१

२) जलशक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्रमांक S-12013 / 5/2024-SBM-I-DDWS दिनांक १८ डिसेंबर, २०२४.

प्रस्तावना :-

विभागाच्या दि. ११ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात केंद्रपुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२ ही योजना आर्थिक वर्ष २०२०-२१ ते २०२४-२५ या पाच वर्षाच्या कालावधीकरीता राबविण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या होत्या.

संदर्भ क्रमांक २ अन्वये केंद्र शासनाने स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२ योजनेस, योजनेच्या स्वरुपामध्ये कोणताही बदल न करता दिनांक १ एप्रिल, २०२५ पासून ३१ मार्च, २०२६ या कालावधीपर्यंत एक वर्षाची मुदतवाढ दिलेली आहे. त्यानुषंगाने राज्यात स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२ या योजनेच्या अंमलबजावणीत दिनांक १ एप्रिल, २०२५ ते ३१ मार्च, २०२६ या कालावधी पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२ या योजनेस केंद्रशासनाने संदर्भ क्र. २ अन्वये मुदतवाढ दिली असल्याने या योजनेच्या राज्यातील अंमलबजावणीस दिनांक १ एप्रिल, २०२५ ते ३१ मार्च, २०२६ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या अंमलबजावणी संदर्भ क्रमांक १ मधील शासन निर्णयात नमूद केलेल्या मार्गदर्शक सुचना, अटी व शर्ती, तसेच यानुषंगाने यापुर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचना या कालावधीतही लागू राहतील.

३.    सदर कालावधीत योजनेच्या निकषानुसार अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती व सर्वसाधारण घटकाकरिता आवश्यक निधी चालू आर्थिक वर्षाशाकरिता अर्थसंकल्पित तरतुदीमधून वित्त विभागाने उपलब्ध करुन द्यावा.

४.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१५१४४२३४२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
Date: 2025.04.15 14:46:24 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव सर्व, मंत्रालय,मुंबई.
७. जिल्हा परिषद अध्यक्षा/ अध्यक्ष, सर्व.
८. सर्व विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी
९. महासंचालक माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.
११. प्रकल्प संचालक, (स्वभामि) राज्य पाणी व स्वच्छता मिशन बेलापूर, नवी मुंबई
१२. उपायुक्त (विकास), सर्व.
१३. निवडनस्ती (पापु-१६), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.